एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-८ (सीपीटीपी-८) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या परिविक्षाधीन नायब तहसीलदार (गट-ब राजपत्रित) यांना पदस्थापना देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सीपीटी-२०२४/प्र.क्र.२१३/ई-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २० फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४
२) शासन अधिसुचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-०५१४/प्र.क्र.२०/१८-ब, दि.०७.११.२०१५
३) समक्रमांकाचे शासन आदेश दि.१३.०२.२०२५.

**शासन आदेश:-**

एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-८ (सीपीटीपी-८) अंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या ४३ परिविक्षाधीन नायब तहसीलदार (गट-ब) यांना उक्त वाचा-३ येथील आदेशान्वये महसुली विभाग वाटप करुन पदस्थापना देण्यात आलेली आहे. आता सदर आदेशातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदस्थापनेत अंशत: बदल करुन स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे सक्षम प्राधिकारी यांनी दिलेल्या मान्यतेनुसार सुधारित पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नांव | यापुर्वी दि.१३.०२.२०२५ रोजीच्या आदेशान्वये दिलेली पदस्थापना | अंशत: बदलाने नव्याने देण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.प्रमोद जयसिंग पाटील | नायब तहसीलदार (महसूल), तहसिल कार्यालय गगनबावडा, जि. कोल्हापूर | नायब तहसीलदार (वसुली), जिल्हाधिकारी कार्यालय कोल्हापूर, जि. कोल्हापूर या रिक्त पदावर |
| २ | श्रीम. पल्लवी म्हसे | निवासी नायब तहसीलदार, तहसिल कार्यालय राळेगाव, जि. यवतमाळ | नायब तहसीलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय जळगाव जामोद, जि. बुलढाणा या रिक्त पदावर |
| ३ | श्रीम.श्रध्दा महादेव चौगुले | नायब तहसिलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय आमगाव, जि. गोंदिया | नायब तहसीलदार (निवडणूक), तहसिल कार्यालय उमरेड, जि.नागपूर या रिक्त पदावर |
| ४ | श्रीम.किरण बालाजी फुले | नायब तहसिलदार (महसूल-१), तहसिल कार्यालय लोहारा, जि.धाराशिव | नायब तहसीलदार, उपविभागीय अधिकारी कार्यालय कळंब, जि. धाराशिव या रिक्त पदावर |

२. उपरोक्त वाचा क्र.३ येथील आदेशामध्ये नमूद अटी व शर्ती उपरोक्त अधिकाऱ्यांना लागु राहतील.

३. उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

४. संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबतचा अहवाल संबंधित विभागीय आयुक्त यांनी शासनास तात्काळ सादर करावा.

५. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी. सदर आदेशान्वये दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न होणाऱ्या अधिकाऱ्याविरुध्द संबंधित विभागीय आयुक्त यांनी तात्काळ शिस्तभंगाची कार्यवाही सुरु करावी तसा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१८२२००२३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2025.02.20 18:24:21 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

विभागीय आयुक्त पुणे /अमरावती/नागपूर/छ. संभाजीनगर.

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
५. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
६. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.
७. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
८. प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपुर.
९. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१०. संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त पुणे /अमरावती/नागपूर/छ. संभाजीनगर यांच्यामार्फत).
११. निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.